“सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: शिवृत्ती-२०२४/प्र.क्र.०६/शिक्षण-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० मार्च, २०२५

**संदर्भ :-** १. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०१८/प्र.क्र.११८/ शिक्षण, दि. ११.१०.२०१८
२. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.२८/ शिक्षण-२, दि. ३०.०८.२०२३
३. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.५७/ शिक्षण-२, दि. ०८.११.२०२३
४. शासन ज्ञापन, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. शिवृत्ती २०२३/प्र.क्र.५७/ शिक्षण-२, दि.२६.०४.२०२४
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि.२८.०२.२०२५ रोजीचे चे पत्र.

**प्रस्तावना:-**

विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासप्रवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील मुलामुलींना परदेशी उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शासन निर्णय संदर्भ क्र.१ दिनांक ११.१०.२०१८ च्या तरतूदीनुसार सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षासाठी शासन निर्णय संदर्भ क्र.२ दिनांक ३०.०८.२०२३ नुसार ५० विद्यार्थ्यांची निवड करण्यात आली आहे. सन २०२३-२४ करिता परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी पुणे विभागातील कु.वरुण सुहास सरदेसाई या विद्यार्थ्याची Columbia University,New York या विद्यापीठात Master Of Public Administration (MPA) या १ वर्ष ९ महिने या कालावधीच्या अभ्यासक्रमासाठी परदेश शिष्यवृत्ती सन २०२३-२४ करिता निवड करण्यात आली आहे. परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत सदर विद्यार्थ्यास प्रथम वर्षातील प्रथम सत्राकरिता व व्दितीय सत्राकरिता अनुक्रमे शासन निर्णय संदर्भ क्र.३ व संदर्भ क्र.४ अन्वये एकुण रु. ७३,५१,७११ /- (अक्षरी रुपये त्र्याहत्तर लक्ष एकावन्न हजार सातशे अकरा फक्त) इतकी शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आली आहे.

सदयस्थितीत सदर विद्यार्थ्याने परदेशातील शैक्षणिक कालावधीच्या द्वितीय वर्षातील प्रथम सत्राकरिता केलेल्या मागणीनुसार संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय पुणे यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये प्रचलित शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वरुण सुहास सरदेसाई यास द्वितीय वर्षातील प्रथम सत्राकरिता देय रक्कम रु. ३८,९३,६११/- (अक्षरी रक्कम रू.अडतीस लक्ष त्र्यान्नव हजार सहाशे अकरा फक्त) इतका निधी वितरीत करण्याबाबत प्रस्तावित केले आहे. यास्तव सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षात परदेशी शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निवड केलेल्या विद्यार्थ्यांपैकी पुणे विभागातील वरुण सुहास सरदेसाई या विद्यार्थ्यास परदेशातील १ वर्ष ९ महिने या कालावधीच्या अभ्यासक्रमासाठी द्वितीय वर्षातील प्रथम सत्राकरिता देय रक्कम रु. ३८,९३,६११/- (अक्षरी रक्कम रू.अडतीस लक्ष त्र्यान्नव हजार सहाशे अकरा फक्त) खालील तक्यातील तपशिलानुसार वितरीत करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | विद्यार्थ्याचे नाव | शैक्षणिक कालावधी | चलन | शिक्षण शुल्क | निर्वाह भत्ता | आरोग्य विमा | विमान प्रवास | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | वरुण सुहास सरदेसाई | २१ महिने | १ USD = ८५.४९१२ | USD$ ३५,९५६ रु. ३०,७३,९२२/- (द्वितीय वर्ष प्रथम सत्र) | USD$ ७७०० रु. ६,५८,२८२/- (द्वितीय वर्ष प्रथम सत्र) | USD$ १८८८ रु. १,६१,४०७/- (द्वितीय वर्ष प्रथम सत्र) | --- | रु.३८,९३,६११/- (द्वितीय वर्ष प्रथम सत्र) |

२. उपरोक्तप्रमाणे निधी वितरणासाठी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त प्रमाणे वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत विहित प्रयोजनासाठी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर खर्चाचे विवरण (जिल्हा निहाय/लाभार्थी संख्या) व उपयोगिता प्रमाणपत्र न चूकता शासनास सादर करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी तथा संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

३. परदेशी शिष्यवृत्ती अंतर्गत शासन निर्णय संदर्भ क्र. १ दि. ११.१०.२०१८ व शासन शुद्धिपत्रक दि. २४.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३ मधील अटी व शर्तीची पुर्तता करुन संबंधित विद्यार्थ्यांचे निधी मागणीचे प्रस्ताव तपासून निधी मंजूर करावा.

४. सदर निधी खर्च करतांना वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका तसेच वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकातील अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांची राहील.

५. सदर खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक झेडजी-०३ (०२) (१८) विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील गुणवंत मुलामुलींना परेदशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती (कार्यक्रम) (२२२५ एफ २१८)" या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध केलेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३१०१४४१४१४१३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIVEDITA LOKESH WARULE

Digitally signed by NIVEDITA LOKESH WARULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=3ef8c2c4c081462a26dea72c10274caaa77d92363242a1bff9454421d88652f3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8A41558A05225BDD429CBDFA69D2436A1EA3BC5173099C377F9F8B13C78A9D57, cn=NIVEDITA LOKESH WARULE
Date: 2025.03.10 14:42:39 +05'30'

**(नि.लो.वारूळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, पुणे.
७. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण यांचे खाजगी सचिव.
८. मा. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवडनस्ती (शिक्षण-२)